महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे १०१४/प्र.क्र.२७९/२०१४/आस्था-३

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख : १७ नोव्हेंबर, २०१४

**संदर्भ :** शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. मविसे-१०१४/प्र.क्र.१११/ २०१४/आस्था-३,दिनांक ३०.५.२०१४.

**शासन आदेश-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) आणि ४ (५) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने श्री.बी.डी. पटेल, तत्कालिन प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, हिंगोली (सध्या रजेवर) यांच्या संदर्भाधीन दिनांक ३०.५.२०१४ च्या बदली आदेशातील अ.क्र.१ अन्वये सहायक आयुक्त (तपासणी), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर या पदावर करण्यात आलेल्या बदलीमध्ये या आदेशान्वये अंशत: बदल करुन; श्री.बी.डी. पटेल यांची पदस्थापना उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता), जिल्हा परिषद, जालना या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने करण्यात येत आहे.

२. श्री.बी.डी. पटेल यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी श्री.बी.डी. पटेल यांना त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. श्री.बी.डी. पटेल यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११७१५०६५५१६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: CN = Bandekar-Deshmukh Sarita Rishi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.11.17 03:55:17 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद / नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली / जालना.
४) महालेखापाल- २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
५) श्री.बी.डी. पटेल, तत्कालिन प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, हिंगोली (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांच्यामार्फत.)
६) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
७) मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
८) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
९) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.